मातृमुखचंद्र दर्शन सहस्त्रचंद्र उत्सव विधी

मातोश्री श्रीमती उषा प्रभाकर भागवत यांस - आई विषयी

"विठ्ठलाची मूर्ती कां उभी विटेवरी पुंडलिका भेटी आलारे नारायण"

"सेवा करिता मातापित्याची श्रेष्ठ त्या भगवन्ताहुनि निगमवचन"

"प्रदक्षिणा विघ्नहर्त्याची जाहली पृथ्वी पावन प्रथम वंदन मातापित्या"

जमलेत सर्व आप्तजन विज्ञप्त करण्या हार्दिक योगऋण
प्रसंगी आठवती तीर्थरूप बाबांचे ते सुगम सहयोगी जीवन
अबोल ती माया त्यांची अबोलचि होती त्यांची शिस्त पण
भटकलो अनेक मंदिरा समक्ष भेटलो अनेक महात्म्या हून ।।१।।

श्रेष्ठ कोणीहि न गावला मजला संयोजित संस्कार कारण
त्रयस्थ नजर ज्यांची प्रेमही त्यांचे निर्विकल्प अफलातून
गमतो अजूनही मी आठवणीत रडतो हृदयंगम सर्व क्षण
आज वाटते असतील तेहि बघत वैभव "आशीर्वादांची" खूण ।।२।।

मागतो मातेचे चरणकमल आश्रित आम्ही सर्वहि ह्या शुभ दिनी
मातृमुख चंद्रमा आम्हा दिसो निरंतर अमुच्या सहस्त्रचंद्र दिनदर्शनी
आरोग्यक्षम आयु शतायुषी मातेला लाभो प्रार्थना ही ईश्वर चरणी
वृद्ध जरांचे आशीर्वाद लाभो आंम्हा निरंतर त्यांच्या सेवारत जीवनी ।।३।।

तव मुखचंद्र आम्ही प्रथम पाहीला अमुच्या ओळखीत जन्मदिनी
खेळलो कधीतरी आकाशीच्या चंद्रासव लहानपणी मामा म्हणूनी
तूची जोडूनी जे दिधले नाते चंद्रविलासी भाउबिजेचे बंधू म्हणून
दृष्टी प्रत्येकावरी ठेवून जो निरंतर पाही भगिनी सुखा जाणूनी ।।४।।